

विनोद कोणाला आवडत नाहीत?
असा प्रश्न विचारल्यावर तुम्ही मनात म्हणाल,
काय पण प्रश्न आहे? नाही, मला समजतय
तुम्ही एखादा कटाक्षही टाकला असता 'काय पण
ध्यान आहे' या अर्थी. पण खरच हो,
काहींना 'विनोद' आवडत नाहीत. अशा लोकांचा
चेहरा लग्गेच माझ्या डोळयांसमोर
उभा राहतो... लांबट चेहरा, त्याला आणखी उग्र
करणारा जाड काळ्या बॉर्डरचा चष्मा, घनदाट
भुवया, एकूणच चेहऱ्यावर सदा न कदा बारा
वाजलेले असतात.

'विनोद' म्हटलं की,
काहींना खूप राग येतो.
नाही हो, कांबळीचा इथे काहीएक संबंध
नाही. कसा असणार? कॉमेडी सर्कसवाल्यांनी तो
कसा लावला देव जाणो!

खरंतर, विनोदी लिहायचं म्हणजे चेष्टा नाही.
विनोद कोणालाही जमत नाहीत. विनोद
सर्वांनाच कळत नाहीत. काहींना उशिरा कळतात.
सगळेच विनोद सर्वांनाच रुचत नाहीत किंवा
पटत नाहीत किंवा झेपत नाहीत. बापरे, असलं
जड-जड लिहून तुमचं (आणि माझं) डोकं जड
करण्यापेक्षा हलक्या-फुलक्या विनोदी कविता
वाचणे केव्हाही चांगलेच, नाही का?

इतरांचं जाऊ द्या. मी तर म्हणते,
'हसलात तितकं जगलात'.
चला तर मग थोडं
जगूयात....?

# चंडीका आली

(गुरु ठाकूर यांची माफ़ी मागून)

चंडीका आली
अवजड  काया की पडछाया
अवस घेऊन आले
नव-याला फ़ोड्ले, झाडूनी झोडले
पदर खोचून आले

मी फ़ेकली ताटली
जाऊन लागली
त्याच्या  कानाखाली
मी क्विन्ट्ल भरली
खाऊन फ़ुगली
टेरर असे भोवताली

चंडीका आली
लपा पलंगाखाली
उमटेल लाली
पुन्हा हो गालाखाली

कडुशार सुरत हेकनी
माझा हो धनी
किती बेजार

पाहता होई तो दुखी,
त्याच्या हो मुखी,
हसे शेजार

हाकते तया एकटी,
बांधुन वळकटी,
होती पसार

कुणी दिली तुम्हाला दाजी
देणगी भंगाराची
फुलाच्या नावाखाली दाजी
टोपली अंगाराची

मी फ़ेकली ताटली
जाऊन लागली
त्याच्या  कानाखाली
मी क्विन्ट्ल भरली
खाऊन फ़ुगली
टेरर असे भोवताली

चंडीका आली
लपा पलंगाखाली
उमटेल लाली
पुन्हा हो गालाखाली

**— शशांक प्रतापराव**



# सिग्नल का बरं डॉलू लागतो ?

(काही तळीराम मित्रांना समर्पित ... !)

एकटाच चालत असताना मी रस्ताही कधी बोलू लागतो
मी स्थिर उभा असलो तरी सिग्नल का बरं डोलू लागतो ?

पेग तसे जास्त नाही , दोन चारच गटकलेले
चकण्याचे फुटके पाकीट, हातामध्ये लटकलेले
उग्र असा तो वास जेव्हा , नाकामध्ये दरवळतो
"सध्या हवा वाईट", मी स्वतःशीच बडबडतो

सोबत कोणी नसतानाही मी वाद कुणाशी घालू लागतो ?
मी स्थिर उभा असलो तरी सिग्नल का बरं डोलू लागतो ?

भीतीचं काहूर माझ्या, मनामध्ये दाटतं
कारण रोजचंच वळण, आज नवीन वाटतं
जाणवलेली भीती, कोणाला दाखवत नाही
घरचा रस्ता मात्र, काही केल्या सापडत नाही
या पायाखालच्या रस्त्यावर मी का आज असा भुलू लागतो?
मी स्थिर उभा असलो तरी सिग्नल का बरं डोलू लागतो ?

एकटं असल्याची जाणीव, मनात रांगते
जेंव्हा हळूहळू अंधारात गर्दी सारी पांगते
थंडगार वारे, कानाच्या पाळीशी खेळतात
उगाचंच भुंकणारे कुत्रे टोळ्यांनी छळतात

वारा तसा सोसाट्याचा नाही, मग मी का बरं झुलु लागतो ?
मी स्थिर उभा असलो तरी सिग्नल का बरं डोलू लागतो ?

एकटाच चालत असताना मी रस्ताही कधी बोलू लागतो
मी स्थिर उभा असलो तरी सिग्नल का बरं डोलू लागतो ?
मी स्थिर उभा असलो तरी सिग्नल का बरं डोलू लागतो ?

— चंद्रजीत कांचन



कोण म्हणतं आमच्या घरात
माझं काही चालत नाही
गरम पाणी मिळाल्याशिवाय
मी भांड्यांना हात लावत नाही

तसे घरातले सगळेच निर्णय
बायको माझ्यावरच सोपवते
धुणं केंव्हा भांडी केंव्हा
माझं मला ठरवू देते

मीही माझ्या स्वातंत्र्याचा
पुरेपूर फ़ायदा घेतो
आधी स्वैपाक करून घेतो
धुणं भांडी मागून करतो

रहाता राहिली केर-फ़रशी
आणि आवरा आवर
तेही पटापट करून टाकतो
बाकीची कामं झाल्यावर

आता विचाराल तुमची बायको
घरात काहीच काम करत नाही ?
अहो असं काय करता
ती माझ्यापासून स्वतःला वेगळं असं धरत नाही

तिने केलं काय, मी केलं काय
सगळं एकच असतं
दोघात भेद करायला जातं
तिथेच जग फ़सतं !!

- प्रसाद



# दारु

नशा आगळी  आज  मद्यात होती
अता धुंद मैफ़ील  रंगात होती

किती पेग आले, किती रिक्त झाले
जणू काय  टाकीच पोटात होती

कधी “स्ट्रेट” गेला, कधी “टॉप” केला
कधी ’नीट’ ’व्हीस्कीच’ बर्फ़ात होती

इथे ’वोडका’ हा, तिथे ती ’टकीला’
अता ’रेड वाईन’ ग्लासात होती

घड्याळात  पाहून बाहेर  आलो;
तरी बाटली बाहुपाशात होती

पुन्हा आज ढोसून आलो घराला
पुन्हा  बायको आज त्वेशात होती

तिने  घातली लाथ  माझ्या बुडाला
शिवीही तिची  पूर्ण वाक्यात होती

पुन्हा झोपलो मी पुराण्या ठिकाणी;
पुन्हा रात माझी, गटारात होती

— **निरज कुलकर्णी**



चैनलची न्यूज

चैनलवाल्यांचे काही  सांगू नका,
ते सुईचेही दाभण करतात
वांझाटीलाही ते
बोलून बोलूनच  गाभण  करतात

बातम्या दाखविण्याऐवजी
ते बातम्या पिकवित  आहेत
उरलेल्या  वेळेमध्ये  ते
गुन्हेगारी शिकवित आहेत

**-सूर्यकांत डोळसे**



**येथे कविता करुन  मिळतील**

ती रुसली असेल तर
खरच चुकले माझे  वाली
ती संतापली असेल तर
सगळे बरोबर तुझे वाली
हव्या तशा आकाराच्या
भावना विणून मिळतील
येथे कविता करुन  मिळतील

शाळेतल्या निबंधच्या
मधे मधे पेरण्यासाठी
स्नेह संमेलनामधे
ईंप्रेशन  मारण्यासाठी
इकडच्या तिकड्च्या कवितांचे
शब्द बेमालूम चोरुन मिळतील
येथे कविता करुन  मिळतील

आवडणा-या  व्यक्ती जवळ
वही  विसरण्यासाठी
मग पुन्हा वही घ्यायला
परत जाण्या साठी
रोमँटीक कवितांनी
वह्या भरुन मिळतील
येथे कविता करुन  मिळतील

**- तुषार जोशी, नागपूर**

# सावधान कवी शिकतो आहे

कवितेच्या गाडीत आजच बसला आहे
नको नको म्हणताना बळेच घुसला आहे
आजच घेतलं आहे कवितेचं सुकाणू हातात
म्हणे मुक्तछंदातली कविता लोक कसे गातात ?
पहा कवितेच्या गाडीचा पहिला गियर टाकतो आहे
सावधान कवी शिकतो आहे !

म्हणे सुरुवातीला थोडी चारोळी ट्राय करतो
मग हवे तर खुशाल मुक्त कुरणात चरतो
मला कुणाचा म्हणे आधार नको आहे
आता पुन्हा कसलीच माघार नको आहे
राईट-लेफ़्ट विसरून गाडी सुसाट हाकतो आहे
सावधान कवी शिकतो आहे !

या वाटेवरच्या ब-याच कविता पार झाल्यात
दोन यमके चार ओळी कधीच ठार झाल्यात
तुम्हाला हि भारी पडेल कवीची हि स्वारी
वरून पुन्हा प्यारी वाटेल कवीची ती sorry
कवितेच्या वाटेचा हर एक सिग्नल चुकतो आहे
सावधान कवी शिकतो आहे !

हवे कशाला म्हणे मात्रा आणि व्रतांचे कोंदण
नको आहे कुठलेच अलंकाराचे गोंदण ?
हा मोडतो मीटर याला आवडते speed
सुसाट वेगाला म्हणे हवे कशाला बंधन ?
तुम्ही please side द्या आता brake ही थकतो आहे
सावधान कवी शिकतो आहे !

उद्या तक्रार नको डोकं जड झाल्याची
कवीची गाडी आणि शब्द डोक्यावरून गेल्याची
याचे chances कमी आहेत या मार्गावर थकण्याचे
याच्याकडे अधिकृत License आहे कविता शिकण्याचे
रोज नवा धडा म्हणून एक नवी कविता फ़ेकतो आहे
सावधान कवी शिकतो आहे !

– रमेश ठोंबरे



# कणा

मोडला 'कणा'
"सोडताय का सर मला?"
जोडून हात दोन्ही
इस्त्री उतरल्या कपड्यांमधली
मुर्ती केविलवाणी

पळभर श्वास रोखून बैस
बोलला वरती पाहून
"Reports अजून दिले नाहीस
चाललास् कुठे पळून?"

सकाळपासून पी सी तुझा
मांडीत घेऊन बसलास
काम अर्धे आहे तरी
येउन ऊभा ठाकलास?

जबाबदारीची जाण नाही
घड्याळ बघत बसतोस
F.T.R. "झिरो" तुझा
नुसतेच दिवस भरतोस

" बैलासारखी कामं करता
डोकं जरा वापरा
५|३० ला घोड्यावर बसता
आधी खाली उतरा "

बैल म्हणताच शेळीच्या त्या
डोक्यात तिडीक गेली
कुणास ठाऊक त्याच्यात इतकी
हिम्मत कुठून आली

झट्क्यासरशी जीभ उचलून
त्याने टाळूस लावली
"records काढून पाहा माझे
सुट्टी कधी घेतली?"

६ महीन्यात घरी
मी वेळेत गेलो नाही
बायको-मुलं रुसून बसलीत
घरात संवाद नाही

मंद झाली बुध्दी आता
राब राब राबुन
लक्ष्मी माय देई
तरी दर्शन आम्हा दुरुन

दिवस दिवस झिजुन झिजुन
मोडला जरी कणा
पाठीवरती हात ठेऊन
नुसते "मर" म्हणा

- रसप
(रणजीत पराडकर)

## बाका प्रसंग

ती मला म्हणाली
एवढ्या तर करतोस कविता
माझ्यावरही कर ना एखादी
आता 'ही'च्या वर 'कविता'
ही गोष्ट आहे का एवढी साधी?

खरं लिहीलं तर जीवाला धोका
खोटं लिहीलं तर प्रसंग बाका
भांबाउन कसंनुसं बळंच हसलो
अन हाय रे देवा! इथेच फ़सलो

म्हणाली आता सोडणारच नाही !
दरवाजा आता उघड्णारच नाही
आत्ताच्या आत्ता कविता कर छान
नाहीतर आवळते बघ तुझी मान

कुठेही गेलं तरी मरण अटळ होतं
मन घाबरुनही थोडंसं चहाटळ होतं
मागुन घेतला एक कागद अन बोरु
घेतलं देवाचं नाव आणि केलं सुरु

**रुपमोहिनी गं तू रमणी ,लाऊ नको झुरणी**
**पाहताच तुला आठवते, मजला तेलाची बरणी**
**रंग तुझा सोनसळी ,नयन तुझे गं मासोळी**
**पहाता तुज समिप, वाटे ठोकावी आरोळी**

....
..
.....

असंच काहीबाही खरडत राहीलो
मनातल्या भितीला चिरडत राहीलो
लिहून झाल्यावर वाचायचा आग्रह
मी ही मनाचा मग केला निग्रह

तांबडी ओळच उघडपणे म्हणालो
निळी मात्र मनातच गुणगुणलो
मनातलं हसू मनातच दाबत होतो
दाद देण्याचा अभिनय करत होतो

कविता संपल्यावर हळूच तिला पाहीलं
नशिब माझं तिला काहीच नव्हतं कळलं
ती खुष, मी खुष, दोघेही मजेत दिसलो
मी मात्र मनातच एकदा मोठ्यांदा हसलो

ती आनंदुन म्हणाली, “किती छान लिहीतोस”
मी मनात म्हणालो, “थांब आता पहातोच”
डोळे मिटुन तिचा हात हातात घेतला
हातात कागद ठेउन हळूच पळ काढला

**- अहं ब्रह्मास्मि**

**'च्यामायला... माझं चुकतय  कुठे... ?'**

गेल्या तीन दिवसात माझ्या हातुन अक्षम्य अपराध झालेत आणि माझे सगळे गुन्हे मला मान्य आहेत. पण प्लीज एकदा माझं ऐका आणि मला सांगा की....'च्यामायला... माझं चुकतय कुठे... ?'

परवा धोब्याला इस्त्रीसाठी होते-नव्हते ते कपडे दिले आणि काल टॉवेलवर त्या मुर्ख धोब्याची (का मुर्ख मी कोणास ठाउक... !) वाट बघत बसलो. आता ऑफीसला उशीर होणार आणि विनाकारण बॉसच्या शिव्या खाव्या लागणार ह्या विचारानी संतापलो आणि त्या धोब्याच्या घरी जाऊन त्याला धुवावं असं विचार करायला लागलो.
पण बनियन आणि टॉवेलवर जाणं प्रशस्त दिसणार नाही म्हणुन त्याला फोनवरच धुवायचं ठरवलं. त्याला फोन लावल्यावर एक आगाऊ आवाजाच्या बाईनी मला डोक्याला झिणखिण्या आणणारा एक मेसेज दिला...

" आपण ज्या व्यक्तीशी संपर्क साधु इच्छित आहात,
 ती व्यक्ती सद्ध्या भारताबाहेर प्रवास करत आहे ".
बेगडेवाडी का घेभडेवाडी... अशा कुठल्यातरी गावावरुन आलेला आपला धोबी कुठं पोहचला अशा विचारात मी बेशुद्ध पडणार इतक्यात दारावरची बेल वाचली. मी जरासं घाबरत... (किंवा लाजत असेल) दार उघडलं...
आणि पाहतो तर काय....
तोच तो आमचा हरामखोर धोबी दात काढत... जणु काही मला दिवाळीची भेट म्हणुन त्यानी कपडे आणले आहेत अशा कौतुकात.... जीवाचा संताप संताप व्हावा इतक्या प्रसन्न चेह-यानी.... मळक्या बनियनवर उभा.

मी निशःब्द आणि निशःस्त्र असल्यानं, कृतकृत्य होऊन अत्यंत कृतज्ञतेने त्यानी केलेल्या लज्जारक्षणासाठी आभार मानुन माझे कपडे ताब्यात घेतले. नेहमीप्रमाणे त्याच्याकडे द्यायला सुट्टे पैसे नसल्यानी त्यालाच ते लक्षात ठेवायला सांगुन, त्याच्या परदेशवारीविषयी विचारताच म्हणाला,
" हं...हं... ते व्हय... त्यो माझा डायलरटोन आहे."
माझ्या तोंडाला फेस आला.

मला कळेना....
तीन किलोमीटर बनियनवर (तो ही मळका.. आणि ते ही धोबी असताना...) येणा-या, अक्षम्य अपराध करुन दात काढणा-या आणि असली

इंटरनॅशनल रिंगटोन असणा-या त्या धोब्याचं दरवाज्यापलिकडचं ते स्वछ... आनंदी... मोकळं जग....!!

आणि दरवाज्याच्या आतलं माझं चिडचिडलेलं... मरगळलेलं..... कसलाही टोन नसलेलं बेसुर जग.... ??

'च्यामायला... माझं चुकतय कुठे... ?'

"काय..... ? तीस रुपये ???"

हे मी इतक्या जोरात ओरडलो की.....

थांबा... तुम्हाला सविस्तरच सांगतो.

काय झालं, काल मस्त पावसाळी हवा होती म्हणुन बायकोला जरा भजी किंवा काहीतरी चटपटीत कर असं म्हणालो तर रागातीशयानी बघायला लागली. जसं काही मी तिला शाही रबडीच करायला सांगीतलं होती. "आटे डाल का भाव पता है क्या" असं काहीतरी हिंदीत वैगेरे बोलायला लागली.

त्यात मी हिंदीत तिच्याशी भांडु शकत नाही,

हे तिला माहित आहे. (तसं मी तिच्याशी कुठल्याच भाषेत

भांडु शकत नाही, पण ह्या वेळेस न भांडण्याचं कारण

'बायकोच्या रागाचा उसळलेला डोंब नसुन माझी हिदीची बोंब' हे होतं.) पिठाचा आणि डाळीचा भजीशी संबंध काय, मला कळेना.

"मग निदान कोथिंबीरीच्या वड्या तरी करं" असं म्हणालो तर कपाटातुन थर्मामीटर घेऊन आली आणि मला ताप आलाय का बघायला लागली.

च्यामायला... मला कळेनाच... माझं चुकतय कुठे... ?

मग इंग्रजीत बडबड करत मी कोथींबीर आणायला बाहेर पडलो. (तसं ती अगदी उच्चविद्याविभुषीत आहे, पण का कोण जाणे, माझं इंग्रजी तिला जडंच जातं थोडं. बहुतेक मी एकदम हाय क्लास शब्द वापरत असणार. .........असो..!)

तर मी सरळ भाजीवालीकडे गेलो. (ही मराठी बाई आहे. मागे एकदा एका हिंदी भाजीवाल्याकडे गेलो आणि "जरा सव्वाशे ग्रॅम पडवळ देना" असं म्हणालो तर अजुबाजुच्या बायका इतक्या हसल्या की त्यानी ते प्लॅस्टीकच्या पिशवीत घालुन वर फुकट दिलं असतं, तरी मी घेतलं नसतं.).

तर मी त्या मराठी बाईकडे कोथिंबीर मागितली आणि ह्या वेळेस

आजुबाजुची लोकं माझ्याकडे आदरानी पाहयला लागली. त्या बाईनी मला कोथिंबीर, तिही न मागता एका पिशवीत घालुन दिली आणि म्हणाली "तीस रुपये !"

"काय..... ? तीस रुपये ???"
हे मी इतक्या जोरात ओरडलो की.....

जाऊ द्या.. कशाला उगाच स्वतःची झालेली शोभा सांगा. नाही परवडत एखाद्याला ३० रुपयाची कोथिंबीर. पण म्हणुन काय.... असो.... त्या अमानुष, असुरी, असह्य, अविस्मरणीय धक्क्यातुन मी सावरायच्या आधिच मला एक फोन आला. पलिकडुन एक गोड बाई... माफ करा, गोड आवाजाची बाई जे म्हणाली ते पुढिलप्रमाणे,

"सर... आमच्या कंपनीकडुन तुमची एका लकी कुपनसाठी निवड करण्यात आली आहे आणि त्यानुसार २ वर्षातुन १० वेळा, ७ दिवस आणि ६ रात्री तुम्हाला काश्मीरला एका ५ स्टार हॉटेलमध्ये राहण्याची सुवर्णसंधी आहे. पण त्यासाठी तुम्हाला ३ दिवसाच्या आत फक्त ९०,००० रुपये भरायचे आहेत. तर कधी येताय... ?"

त्या सगळ्या आकड्यांनी मला इतकं गरगरलं की मी काय बोलतोय मलाच कळेना. मी तिला म्हणालो की हे कुपन तुम्ही दुस-या कोणाला तरी विकुन त्या बदल्यात मला कोथिंबीरीच्या ३ गड्ड्या द्याल का ?

तिनी मला इंग्रजी भाषेत (बीप बीप) शिव्या घातल्या..
गड्डी परत दिली म्हणुन भाजीवालीनी मराठीत (बाप बाप) शिव्या घातल्या आणी तसंच घरी परत आलो म्हणुन बायकोनी हिंदीत मेरे इज्जत की धंज्जीया उडा दी !

का वागतात ह्या सगळ्या बायका असं ?
च्यामायला... मला सांगा, माझं चुकतय कुठे... ?

आज सकाळी माझ्या ५ वर्षाच्या मुलीचा अभ्यास घ्यायला बसलो होतो.

आजकालची मुलं म्हणजे भारी उर्मट आणि आगाऊ आहेत हो ! जराही अभ्यास करायला नको दुसरं काय...
आमच्या वेळेला कसं... म्हणजे मी अभ्यासात जरी हा नसलो तरी एकदम हा ही नव्हतो. म्हणजे खुप काही अगदी हे नाही पण म्हणजे... आमच्या वेळेला अभ्यासापेक्षा व्यवहारज्ञान जास्त महत्वाचं असायचं.. म्हणजे पास नापास काय... म्हणजे अगदी सगळ्याच विषयात किंवा प्रत्येक वर्षी असं नाही पण... असो....

तर मग मी तिच्या होमवर्कची वही घेतली आणि पहिला बॉम्ब इंग्रजीचा. म्हणजे मला तसा काही प्रॉब्लेम नाहीये इंग्लिशचा... पण तिच्या आईलाच जिथं माझं हाय क्लास इंग्लिश कळत नाही, तिथं त्या चिरमुरडीला काय कळणार. मी वही उघडली पण इंग्लिश सारखं काही दिसेना. काहीतरी 'फोनीक साऊंड' असा होमवर्क होता. मला कळेना हो... हे फिजिक्स किंवा इंजीनीयरींग चे विषय हल्ली ज्युनिअर केजीला कधीपासुन आलेत ?
मग कळालं... म्हणजे मुलीकडुनच कळालं की इंग्रजी अक्षरांचे उच्चार आपण ज्या प्रकारे करतो त्याला 'फोनीक साऊंड' म्हणायचं. अर्थात हे सांगताना ती तिच्या आईसारखं डोळयातुन "बावळट" असं म्हणायला विसरली नाही. नंतर ती ते तोंडानी पण म्हणाली. पण माझी चुक नव्हती हो....
आम्ही Z ला झेडच म्हणायचो... आता त्याला ज्ज्ज्ज्ज्सस्स्स्झ्झ्झ्झी म्हणतात हे मला बापड्याला कसं कळणार. बर तो विषय टाळुन तिला आय फॉर आयस्क्रिम असं शिकवायला गेलो तर म्हणाली, "चूक ! आय सेझ ई, आय फॉर ईग्लु... नॉट आयस्क्रीम !!"
आमच्या इंग्रजीच्या दाते मास्तरांची शपथ.... ती काय बोलली मला अजुन कळालं नाहीये.
पोमोग्रएनेट म्हणजे नक्की कुठलं फळ.. माहित नव्हतं.
मुळयाला इंग्रजीत काय म्हणायचं... माहित नव्हतं.
त्या इंग्रजी कविता वैगेरे आपल्याला कधी जमल्याच नाहीत.
गाणी म्हणता येत नाहीत, चित्र काढता येत नाहीत.
पर्पल आणि व्हायोलेट ह्याला माझ्याकडे एकच जांभळा हा शब्द आहे हो.... पण तिच्याकडुन तीच ती नजर पुन्हा आल्यानी मी ते ही बंद केलं.... माझं नशीब तिला गणित विषय नाही, नाहीतर....

काय आहे..... माझं गणित पण इंग्लिश सारखं जरा हाय क्लासच आहे. पण म्हणुन जे घडलय ते सगळं तिनी जाऊन आईला सांगणं चुकच होतं.
मग दोघींनी मिळुन माझी शाळा घेतली.... हल्ली माझा मराठी बाणा जरा जागा व्हायला लागलाय पण आज बायको आणि उद्या मुलगी फाडुन खातील म्हणुन गप्प आहे.

एक सांगु तुम्हाला, मी सोडुन बाकीचे सगळे बरोबरच असतात. तो धोबी, ती भाजीवाली, ती टेली-कॉलर, बायको, मुलगी, हे तर असतातच पण वॉचमन, बसचा कंड्क्टर, दुकानदार, ट्रॅफिक पोलीस, भिकारी, ती मराठी माणसं , हिंदी माणसं, इंग्रजी माणसं, कन्नड, तेलगु, हिब्रु माणसं.... आजुबाजुची दिसणारी सगळीच माणसं... सगळेच बरोबर असतात... मी सोडुन !
मला मान्य आहे की मी चुक आहे. पण मला एक सांगा....
" च्यामायला... माझं चुकतय कुठे... ?"
-धुंद रवी .